आदर्श अंगणवाडी योजना राज्यात **राबविण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१६/प्र.क्र.९७/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : **११ एप्रिल, २०१७**

**प्रस्तावना :-**

बालकांच्या आणि महिलांच्या सर्वांगिण विकासासाठी एकात्मिक बाल विकास सेवा योजना महिला व बाल विकास विभागामार्फत राज्यात राबविण्यात येते. या योजनेची अनेक उद्दिष्टे आहेत. परंतु अंगणवाडीतील (० ते ६) वयोगटातील बालकांचा भौतिक, शारिरीक आणि सर्वांगिण विकासासाठी प्रयत्न करणे हे उद्दिष्टे साध्य करण्यासाठी पोषणयुक्त आहार, लसीकरण, आरोग्य तपासणी, आरोग्य शिक्षण, औपचारिक शालेय शिक्षण या सेवा अंगणवाडी केंद्रातून अंगणवाडी सेविकेमार्फत पुरविण्यात येतात.

२. महाराष्ट्र राज्यामध्ये ९७२६० अंगणवाडी केंद्र व ११०८४ मिनी अंगणवाडी केंद्र अशी एकूण १०८३४४ अंगणवाडी केंद्र ५५३ एकात्मिक बाल विकास सेवा प्रकल्पांमध्ये कार्यरत आहेत. सदर प्रकल्पांमध्ये सुमारे ४००० पर्यवेक्षिका / मुख्यसेविका आणि २ लाख अंगणवाडी सेविका / मदतनीस आणि मिनी अंगणवाडी सेविका या ग्रामपातळीवर कार्यरत आहेत.

३. अंगणवाडी सेविकेमार्फत एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत आरोग्य, पोषण आहार व पूर्वप्राथमिक शिक्षण या बाबी पुरविण्यात येतात. याकरीता सदर अंगणवाडी केंद्राचे रुपांतर आदर्श अंगणवाडी केंद्रामध्ये रुपांतरीत करणे ही काळाची गरज आहे. सदर केंद्रांमध्ये मुलांना आनदंदायी वातावरणात पूर्व शालेय शिक्षण, आरोग्य, पोषण आहार देण्यात येईल. तसेच किशोरवयीन मुली व महिलांना कौशल्य विकास कार्यक्रमाअंतर्गत प्रशिक्षित करता येईल. याकरीता राज्य शासन स्वतःच्या निधीतून टप्प्याटप्प्याने आदर्श अंगणवाडी योजना राबविण्याचे विचाराधीन होते. त्यानुसार प्रथम टप्प्यात ५ हजार अंगणवाडया सन २०१६-१७ मध्ये आदर्श अंगणवाडी मध्ये रुपांतरीत करण्याची बाब विचाराधीन होती. तथापि सन २०१७-१८ यावर्षापासून टप्याटप्प्याने अंगणवाडयांचे आदर्श अंगणवाडयांत रुपांतर करण्यात येणार आहे. सन २०१७-१८ मध्ये ५००० अंगणवाडी केंद्र आदर्श अंगणवाडी मध्ये रुपांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१७-१८ या चालू आर्थिक वर्षात प्रथम टप्प्यात राज्यातील ५००० व त्यांनतर प्रत्येकवर्षी टप्याटप्प्याने अंगणवाडयांचा दर्जा सुधारुन व त्यांच्या पायाभूत सोयी-सुविधांमध्ये वाढ करुन त्यांना आदर्श अंगणवाडीमध्ये रुपांतरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेअंतर्गत आदर्श अंगणवाडी करीता खालील नमूद केलेल्या बाबी समाविष्ट राहतील.

| अ. क्र. | बाब | तपशिल | स्पष्टीकरण |
|---|---|---|---|
| १ | सौर ऊर्जा संच आधारीत अंगणवाडी | प्रत्येक अंगणवाडी केंद्राला विद्युत पुरवठा पंखा व एल.ई.डी. टि.व्ही. संच यांच्या करीता ०.५ KV क्षमता असलेला सौर ऊर्जा संच पुरविण्यात येतील. ज्यामध्ये सोलर पॅनल, बॅटरी व कन्व्हर्टर, इ. सुविधा असतील. याशिवाय अंगणवाडीमध्ये पंखा आणि लाईटची सुविधा उपलब्ध नसल्यास ते देखील पुरविण्यात येईल. | राज्यामध्ये १४१३२ अंगणवाडी केंद्रांना सद्य:स्थितीमध्ये विद्युत पुरवठा उपलब्ध आहे. तथापि लोडशेडींगमुळे त्यांना अनेक अडचणी उद्भवतात. याकरीता सर्व अंगणवाडी केंद्रांना सौर ऊर्जा आधारीत संच पुरविणे आवश्यक आहे. |
| २ | अंगणवाडी इमारत ही शैक्षणिक मदत केंद्र म्हणून बनविणे | अंगणवाडी इमारतीच्या भिंती, दरवाजे, सिलिंग व फ्लोअर, इत्यादींना शैक्षणिक साधन म्हणून वापर करणे. त्यामध्ये प्राणी, फळे, फुले, इत्यादीची चित्रे भिंतीवर रंगविण्यात येतील. | यामुळे आदर्श अंगणवाडी केंद्रामध्ये दिले जाणारे शिक्षण हे बाल केंद्रीत व आनंददायी वातावरणात दिले जाईल. |
| ३ | ई-लरनिंग साहित्य पुरविणे | प्रत्येक अंगणवाडी केंद्रामध्ये LED T.V. व USB Port व Pen Drive पुरविण्यात येईल. ज्यामध्ये नर्सरीच्या मुलांसाठी गाणी, शैक्षणिक साहित्य, इत्यादीचा समावेश असेल. ज्यामुळे मुलांना रंग, अक्षर व शब्द, शैक्षणिक खेळ, इत्यादी बाबी सहजरित्या समजतील. | ई-लरनिंग साहित्य उपलब्ध केल्यामुळे अंगणवाडीतील मुलांना आनंददायी वातावरणामध्ये गुणवत्तापुर्ण अनौपचारिक शिक्षण देता येईल. तसेच सदर शैक्षणिक व्हिडीओचा उपयोग किशोरवयीन मुली व महिलांना प्रशिक्षण देण्याकरीताही करण्यात येईल. |
| ४ | आदर्श अंगणवाडीतील मुलांसाठी टेबल व खुर्च्या पुरविणे. | प्रत्येक अंगणवाडी केंद्राला सुमारे ३० मुलांकरीता टेबल व खुर्च्या उपलब्ध करणे. | आदर्श अंगणवाडी केंद्रातील मुलांना आनंददायी वातावरणात अनौपचारिक शिक्षण देणे, सदर बाबींचा पुरवठा करणे आवश्यक आहे. त्याद्वारे मुलांच्या शैक्षणिक विकासाला प्रोत्साहन मिळेल |
| ५ | स्थानिक साहित्यावर आधारीत शैक्षणिक साहित्य निर्माण करणे | स्थानिकरित्या उपलब्ध वस्तूंवर आधारीत शैक्षणिक साहित्य (उदा. मातीची भांडी, झाडांची पाने, इ.) चा वापर करुन शैक्षणिक साहित्य विकसित करण्यात येईल व त्याद्वारे अंगणवाडीतील मुलांना अनौपचारिक शिक्षण देता येईल. | सदर साहित्यांचा वापर केल्यामुळे कोणताही आर्थिक भार पडणार नाही. तसेच सर्व अंगणवाडी सेविकांना सदर साहित्याचा वापर करण्याबाबत प्रशिक्षण वर्षाच्या सुरुवातीला देण्यात येईल. |
| ६ | अंगणवाडीतील मुलांकरीता स्वच्छ भारत किट पुरविणे | अंगणवाडीतील प्रत्येक मुलाला स्वच्छ भारत किटचा पुरवठा करण्यात येईल. त्यामध्ये लिक्विड साबण, हात रुमाल / टिश्यु पेपर, कंगवा, पाण्याची बॉटल, | सदर साहित्याचा पुरवठा केल्यामुळे मुलांना स्वच्छतेच्या सवयी बालपणापासूनच लागेल. स्वच्छतेच्या सवयी लागल्यामुळे मुलांना आजार |

| | | | |
|---|---|---|---|
| | | साबण, इ. चा समावेश असेल. तसेच अंगणवाडी सेविकेला देखील १ किट पुरविण्यात येईल. त्यामध्ये नेलकटर, कात्री, टाईल्स धुण्याची पावडर, इ. चा समावेश असेल. | कमी होतील आणि त्यामुळे कुपोषण कमी करण्यास मदत होईल. मुलांना स्वच्छतेची सवय लहानपणापासूनच लागल्यामुळे ते "स्वच्छता दूत" बनू शकतात व कुटुंबातील इतर व्यक्तिंना देखील घराची व परिसराची स्वच्छता राखण्याबाबत प्रेरणा मिळेल. |
| ७ | वॉटर प्युरिफायर (वीज विरहीत) पुरविणे | प्रत्येक अंगणवाडी केंद्राला शुध्द व सुरक्षित पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करण्यासाठी वीज विरहित वॉटर प्युरिफायर पुरवठा करण्यात येईल. | सदर बाबीचा पुरवठा केल्यामुळे मुलांमध्ये पिण्याच्या पाण्यामुळे होणारे आजार रोखण्यास मदत होईल. त्यामुळे कुपोषणाला आळा घालण्यास देखील मदत होईल. |
| ८ | इलेक्ट्रॉनिक वजनकाटा पुरविणे | प्रत्येक आदर्श अंगणवाडीला मुलांचे व गर्भवती मातांचे नियमित वजन करणेसाठी इलेक्ट्रॉनिक वजनकाटा पुरवठा करणे आवश्यक आहे. | सदर बाबीचा पुरवठा केल्यामुळे मुलांचे व गर्भवती मातांचे नियमित वजन करणे शक्य होईल. त्यामुळे कुपोषित मुले व माता पहिल्या टप्प्यात ओळखणे शक्य होईल व त्यांना योग्य आहाराचा पुरवठा करुन कुपोषणावर मात करता येईल. |
| ९ | हाईट मेजरमेंट टेप पुरविणे | प्रत्येक आदर्श अंगणवाडीला १०MUAC Tapes आणि २ Hight Measuring Tapes (५ फूट) चा पुरवठा करण्यात येईल. | सदर बाबीचा पुरवठा केल्यामुळे मुलांची उंची नियमित मोजमाप करणे शक्य होईल. तसेच Mid-Upper Arm Circumference मुळे कुपोषणाच्या केसेस जागेवर ओळखणे शक्य होईल. त्यामुळे तातडीने कुपोषणावर मात करणे शक्य होईल. |

३. आदर्श अंगणवाडी या योजनेची अंमलबजावणी व निवडप्रक्रिया करण्याची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील :-

१) स्वत:च्या इमारती असलेल्या ६८००० अंगणवाडयांची आदर्श अंगणवाडयांसाठी निवड करण्यात येईल.

२) ६ महसूल विभागात ५००० अंगणवाडयांची आदर्श अंगणवाडीत रुपांतरीत करताना प्रत्येक महसूल विभागात सर्वसाधारणपणे ८३३ अंगणवाडयांची संख्या येते. एका विभागात ८३३ अंगणवाडयांची संख्या गृहीत धरल्यास एका जिल्हयासाठी सर्वसाधारणपणे १४४ अंगणवाडया येतात.सदर जिल्हयातील प्रती प्रकल्प किमान १० अंगणवाडया मा.राज्यमंत्री/मा.मंत्री (म.व बा.वि.),यांच्या आदेशाने आदर्श अंगणवाडीमध्ये रुपांतरीत करण्यात येतील.

३) याबाबतचे सनियंत्रण संबधित जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी ,जिल्हा परिषदा आणि महिला व बाल विकास अधिकारी ,जिल्हा परिषद यांच्याकडे राहील.

४. **बेसलाईन सर्वेक्षण :-**

बेसलाईन सर्वेक्षणामुळे सद्य:स्थितीत अंगणवाडीच्या विकासासाठी अस्तित्वात असलेल्या विविध सोयी सुविधांचा वस्तुनिष्ठ आढावा घेणे शक्य होईल. ज्या सुविधांचा आभाव आहे त्या सुविधा संबंधित अंगणवाडीला पुरविणे शक्य होईल. तसेच या सर्वेक्षणामुळे अभाव असलेल्या पायाभूत सोयी सुविधा आणि तसेच भविष्यात संभाव्य असलेल्या आर्थिक आणि मानवीय विकासाशी निगडीत बाबींबद्दल डाटा उपलब्ध होईल. शक्यतो सदर सर्वेक्षण बाल विकास प्रकल्प अधिकारी यांनी करावे. त्यामुळे अंगणवाडीतील सोयी सुविधांबाबत वस्तुनिष्ठ चित्र समोर येईल. या सर्वेक्षणाकरीता नमुना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे मार्फत उपलब्ध करण्यात येईल. हा कार्यक्रम अंगणवाडी टास्क फोर्सने बारकाईने राबवायचा आहे जेणेकरुन अंगणवाडीच्या कामाचे सूक्ष्म मुल्यमापन करता येईल. आदर्श अंगणवाडयांची निवड करताना संबधित क्षेत्राची आधार रेखा (बेसलाईन) आणि आर्थिकस्तर (इकॉनोमिक्स) स्टेटस यांची तुलनात्मक विचार करुन निकष ठरविण्यात यावेत.

५. **योजनेची अंमलबजावणी :-**

याबाबतचे सनियंत्रण आणि अंमलबजावणी संबधित जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद आणि महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद यांची राहील.

६. **नियमित मासिक आढावा आणि कार्याचे मुल्यमापन :-**

संबंधित महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद आणि बाल विकास प्रकल्प अधिकारी यांनी कार्याबाबत सूक्ष्मरित्या मुल्यमापन करावे. त्यामध्ये संबंधित अंगणवाडीने ठराविक विशिष्ट कालावधीत काय साध्य केले आहे व ठराविक कालावधीत कोणती कामे पुर्ण करु शकेल याबाबतचा आढावा अहवाल नियमितपणे शासनाच्या अभिलेखाकरीता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचेमार्फत सादर करतील. तसेच Online MIS प्रणाली विकसित करण्यात येईल व त्याद्वारे प्रकल्प टास्क फोर्स नियमितपणे त्याबाबतची छायाचित्रे व प्रगती अहवाल अद्यावत करतील. आदर्श अंगणवाडयांमधील मुलांची उपस्थिती दर दिवशी व्हॉटसअपच्या माध्यमातुन उप आयुक्त (अंगणवाडी ) ए.बा.वि.सेवायोजना यांना सादर करण्यात यावी. सदर अहवाल जनतेसाठी पारदर्शकता व उत्तरदायित्व करीता उपलब्ध होतील. तसेच सदर अहवाल पारदर्शकता आणि जबाबदारी (accountability) याची खात्री करण्यासाठी सार्वजनिक केले जातील. वस्तु खरेदीमध्ये दुरुक्ती होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.विभागामार्फत अंगणवाडी केंद्रामध्ये उपलब्ध असलेल्या वस्तु आणि मागील ३ वर्षात झालेली खरेदी याच्या माहितीचे संकलन (Data Base) तयार करण्यात यावा.

विभागामार्फत स्मार्ट अंगणवाडी योजनेची उल्लेखनीय कामगिरी करणाऱ्या प्रकल्पाकरीता जिल्हास्तर व राज्यस्तरावर बक्षिस देण्यात येईल. सदर बक्षिस वितरण समारंभ राष्ट्रीय बालिका दिन / आंतरराष्ट्रीय महिला दिन / स्वातंत्र्य दिन / प्रजासत्ताक दिन या प्रसंगी प्रदान करण्यात येतील.

**प्रति आदर्श अंगणवाडी करीता आर्थिक खर्च खालीलप्रमाणे राहील.**

| अ. क्र. | बाब | रक्कम |
|---|---|---|
| १ | अंगणवाडी साठी सौर ऊर्जा संच | ६०,००० |
| २ | अंगणवाडी इमारतीसाठी शैक्षणिक साहित्य | १५,००० |
| ३ | ई- लरनिंग पायाभूत सुविधा - LED TV with USB port and Pendrive | ३०,००० |
| ४ | बालकांसाठी खुर्च्या व टेबल | १५,००० |
| ५ | बालकांसाठी स्वच्छ भारत संच | १५,००० |
| ६ | वॉटर प्युरिफायर (वीज विरहीत) | ७,००० |
| ७ | इलेक्ट्रॉनिक वजनकाटा | १५,००० |
| ८ | हाईट मेजरमेंट टेप | २,००० |
| ९ | किरकोळ आणि देखभाल खर्च | ६,००० |
| | एकूण | १,६५,००० |

राज्यात प्रतिवर्षी एकूण ५००० आदर्श अंगणवाडया स्मार्ट अंगणवाडयांमध्ये रुपांतरीत करण्यासाठी पुढीलप्रमाणे एकूण रु.८४.५० कोटी आर्थिक तरतूद आवश्यक राहील.

| अ. क्र. | तपशिल | युनिट खर्च | युनिटची संख्या | रक्कम (रुपये कोटीमध्ये) |
|---|---|---|---|---|
| १ | जिल्हास्तरावर प्रबोधन, प्रशिक्षण व जनजागृती कार्यशाळा आयोजित करणे. | रु.१,००,०००/- प्रती जिल्हा | ३६ | ०.३६ कोटी |
| २ | आदर्श अंगणवाडी करीता प्रतिवर्ष खर्च | रु.१,६५,०००/- प्रती अंगणवाडी | ५००० | ८२.५० कोटी |
| ३ | आदर्श अंगणवाडी योजनेत उल्लेखनीय कामगिरी केलेल्या प्रकल्पाला पारितोषिक | | | |
| अ | जिल्हयातील उत्कृष्ट अंगणवाडी (प्रथम, द्वितीय आणि तृतीय) | प्रथम क्रमांक रु.७५,०००/-, द्वितीय क्रमांक रु.५०,०००/- आणि तृतीय क्रमांक रु.२५,०००/- | ३६ | ०.५४ कोटी |
| ब | राज्यातील उत्कृष्ट अंगणवाडी (प्रथम, द्वितीय आणि तृतीय) | प्रथम क्रमांक रु.१,००,०००/-, द्वितीय क्रमांक रु.६५,०००/- आणि तृतीय क्रमांक रु.३५,०००/- | | ०.०२ कोटी |
| ४ | प्रशासकीय खर्च | | | १.०८ कोटी |
| | एकूण | | | ८४.५० कोटी |

आदर्श अंगणवाडी योजनेच्या अंमलबजावणीचे सनियंत्रण व मार्गदर्शन करणेकरीता राज्यस्तरीय सुकाणु समिती गठित करण्यात येईल. सदर समितीची रचना पुढीलप्रमाणे राहील. समितीची बैठक ३ महिन्यातून एकदा आयोजित करण्यात येईल.

१) सचिव, महिला व बाल विकास विभाग - अध्यक्ष

२) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग - सदस्य

३) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग - सदस्य

४) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग - सदस्य

५) उप सचिव (एबाविसेयो), महिला व बाल विकास विभाग - सदस्य सचिव

तसेच सदर योजनेच्या अंमलबजावणीकरीता कार्यकारी समिती गठित करण्यात येईल. सदर कार्यकारी समितीची बैठक ३ महिन्यातून एकदा घेण्यात येईल. सदर समितीची रचना पुढीलप्रमाणे राहील.

१) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई - अध्यक्ष

२) आयुक्त, कुटुंब कल्याण सार्वजनिक आरोग्य विभाग, पुणे - सदस्य

३) आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक - सदस्य

४) आयुक्त, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, पुणे - सदस्य

५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद/ प्रतिनिधी - सदस्य

६) उपायुक्त (अंगणवाडी), ए. बा. वि. से. यो., नवी मुंबई - सदस्य सचिव

७. आदर्श अंगणवाडी योजनेकरीता नविन लेखाशिर्ष तसेच आवश्यक निधी नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने सन २०१७-१८ मध्ये यथावकाश उपलब्ध करुन घेण्यात येईल..

८. सदर शासन मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक ३० मार्च २०१७ रोजीच्या बैठकीत मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१०१४०७५१४१३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.04.13 17:01:02 +05'30'

( ला.रा.गुजर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई

५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक

६. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव ( ले व को.),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१३. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
१५. आयुक्त, कुटुंब कल्याण सार्वजनिक आरोग्य विभाग, पुणे
१६. आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक
१७. आयुक्त, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, पुणे
१८. सर्व विभागीय आयुक्त
१९. सर्व जिल्हाधिकारी
२०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२१. सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका
२२. उप सचिव (एबाविसेयो), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. उपआयुक्त (अंगणवाडी), एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
२४. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
२५. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी )
२६. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका,
२७. सर्व मंत्रालयीन विभाग
२८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
२२. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद
२३. सर्व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद
२४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२७. महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२८. निवड नस्ती (कार्यासन ६)